**पर्यावरण शिक्षण केंद्र**
मध्यक्षेत्र कार्यालय, ए-१०, गार्डन इस्टेट, सिटी इंटरनॅशनल शाळेजवळ,
१६७/१, १६८/१, नवीन डी.पी. रोड, औंध, पुणे ४११ ००७.
फोन : (०२०) २५८९८४४७, २५८८७००९
फॅक्स : (०२०) २५८८७००९
ई-मेल : cee.central@vsnl.com
-वेबसाईट : http://www.ceeindia.org

**भारतीय सांस्कृतिक व कला निधी (इन्टॅक)**
द्वारा : किर्लोस्कर ऑईल इंजिन्स लि.,
लक्ष्मणराव किर्लोस्कर मार्ग, खडकी, पुणे ४११ ००३
फोन : (०२०) २४१३४०७२
ई-मेल : intachpune@koel.co.in,
intach_pune@yahoo.com
वेबसाईट : http://www.intach-pune.org

# पुणे परिसरातील दुर्मिळ वृक्ष

डॉ. विनया घाटे
डॉ. हेमा साने

**पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे**
**भारतीय सांस्कृतिक व कला निधी, पुणे**

## पुणे परिसरातील दुर्मिळ वृक्ष

**पर्यावरण शिक्षण केंद्र, एज्युटेक, भारतीय सांस्कृतिक व कला निधी (इन्टॅक) व प्राज फाउन्डेशन द्वारा पुरस्कृत**


**प्रकाशक** **पर्यावरण शिक्षण केंद्र**

मध्यक्षेत्र कार्यालय, ए-१०, गार्डन इस्टेट, सिटी इंटरनॅशनल शाळेजवळ,
१६७/१, १६८/१, नवीन डी.पी. रोड, औंध, पुणे ४११ ००७.
फोन : (०२०) २५८९८४४७, २५८८७००९
फॅक्स : (०२०) २५८८७००९
ई-मेल : cee.central@vsnl.com
वेबसाईट : http://www.ceeindia.org

**भारतीय सांस्कृतिक व कला निधी (इन्टॅक)**

द्वारा : किर्लोस्कर ऑईल इंजिन्स लि.,
लक्ष्मणराव किर्लोस्कर मार्ग, खडकी, पुणे ४११ ००३
फोन : (०२०) २४१३४०७२
ई-मेल : intachpune@koel.co.in, intach_pune@yahoo.com
वेबसाईट : http://www.intach-pune.org


पर्यावरण शिक्षण केंद्र (सी.ई.ई.) ही पर्यावरण शिक्षण कार्यक्रमात राष्ट्रीय पातळीवर कार्यरत असलेली अग्रेसर संस्था आहे. नेहरू फाऊंडेशनशी संलग्न असलेल्या या संस्थेस भारत सरकारच्या वन व पर्यावरण मंत्रालयाचे अनुदान प्राप्त आहे. मुले, युवक वर्ग, शिक्षणाधिकारी व एकंदर समाजात पर्यावरणाविषयी जाणीव निर्माण करणे हे संस्थेचे मुख्य उद्दिष्ट आहे. स्थानिक पातळीवर सहज, सोप्या पर्यावरण शिक्षण कार्यक्रमांची निर्मिती शक्य व्हावी यासाठी सी.ई.ई. तर्फे नाविन्यपूर्ण शैक्षणिक साहित्य व कार्यक्रम तयार केले जातात. सी.ई.ई.च्या उपक्रमातून त्यांची उपयुक्तता, परिणामकारकता तपासली जाते.




**संयोजन** क्रांती यार्दी, संस्कृती मेनन

**सहयोग** वैशाली पंडितराव, कपिल सहस्रबुद्धे

**नकाशा आखणी** मॅरीअन झुंजा

**मुखपृष्ठ व मांडणी** मुद्रा

**मुद्रक** सुजित पटवर्धन, मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३०

# पुणे परिसरातील दुर्मिळ वृक्ष

शालेय विद्यार्थ्यांसाठी लिहिलेल्या ह्या अत्यंत उपयुक्त ग्रंथाबद्दल लेखिका डॉ. हेमा साने आणि डॉ. विनया घाटे अभिनंदनास पात्र आहेत. आदरणीय कै. वर्तकसरांचा वारसा समर्थपणे चालवणा-या लेखिकाद्वयींचा वनस्पतीशास्त्राचा, विशेषतः सपुष्प वनस्पती वर्गीकरणशास्त्राचा प्रदीर्घ व्यासंग व प्रत्यक्ष अनुभव निसर्गप्रेमींना ज्ञात आहेच. त्यांनी पुणे परिसरातील काही दुर्मिळ वृक्षांचा परिचय अचूक पद्धतीने, चपखल शब्दयोजना आणि प्रकाशचित्रांच्या साहाय्याने करून दिला आहे. ह्या पुस्तकाच्या रूपाने शालेय विद्यार्थ्यांच्या निसर्गसहली, शिबिरे, सुट्टीतील वर्ग अशा उपक्रमांसाठी विद्यार्थ्यांना व अध्यापकांना एक चांगले मार्गदर्शक साधन उपलब्ध झाले आहे. इतरही सर्व निसर्गप्रेमी वनस्पती अभ्यासकांना वृक्षपरिचयासाठी प्रस्तुत पुस्तकाचा उपयोग होईल यात शंका नाही.

प्रकाशक इन्टॅक व पर्यावरण शिक्षण केंद्र, श्रीमती संस्कृती मेनन, कमिन्स नेचर क्लबच्या डॉ. क्रांती यार्दी आणि श्रीमती वैशाली पंडितराव आणि सर्व संबंधितांना मनःपूर्वक धन्यवाद! लेखिकांचे पुन च हार्दिक अभिनंदन!

**प्रा. श्री.द. महाजन**

# मनोगत

प्रत्येक नगराला, महानगराला त्याचा स्वतंत्र असा वारसा असतो आणि त्याची अनेक रूपं असतात. शनिवार वाडा, सारसबाग, पर्वती ही जशी पुण्याची ऐतिहासिक स्मारके आहेत त्याचप्रमाणे दुर्मिळ वृक्ष ही नैसर्गिक स्मारके आहेत. विख्यात वनस्पतिशास्त्रज्ञ कै.डॉ. वा.द. वर्तक हे पुण्याच्या वनश्री-अभ्यासाचे आद्य प्रवर्तक. त्यांनी जवळजवळ १९५५-५६ पासून अशा दुर्मिळ वृक्षांच्या नोंदी केलेल्या आहेत.

काळाच्या ओघात, विकास-कामाच्या रेट्यात, पानशेतच्या प्रलयात यातील अनेकजण वाहून गेले. पण काहीजण आजही तग धरून आहेत अगदी एकेकटे. अशा आपल्याच घरातील एकल्याचे एकटेपण दूर करणं आपल्याच हातात आहे. त्यासाठी त्यांची पुढील पिढी निर्माण करण्याची जरूरी आहे. अर्थात त्यांची जास्तीत जास्त लागवड करून.

जशी ही जुनी हिरवी स्मारके आहेत, तसेच नव्याने दाखल झालेली काही मंडळी आहेत. त्यातील काही अनेक ठिकाणी रुजली, त्यांनी आपलं स्थान निर्माण केलं. काहींना इथं जुळवून घेता आलेलं नाही. त्यामुळे हे हिरवे पाहुणे अजूनही एकाकी आहेत. एकुलते एक आहेत, त्यांचीही नोंद इथे आहे. या परदेशी पाहुण्यांचा अभ्यास करावा. परन्तु परदेशी प्रजातींची एक काळजी घेणे अत्यंत आवश्यक आहे, ती म्हणजे ह्या प्रजाती टणटणी, सुबाभूळ किंवा वेड्या बाभळीसारख्या 'इन्व्हेझिव'* तणं बनणार नाहीत.

पुण्यातील दुर्मिळ वृक्षांसंबंधी सर्वप्रथम लेखिका डॉ. विनया घाटे यांनी विश्व प्रकृति निधीच्या १९९४ निसर्गमित्र दैनंदिनी मध्ये लेखन केले. त्यानंतर १९९९ साली 'दैनिक केसरी' तून अशा काही वृक्षांना प्रस्तुत लेखिकांनी प्रकाशात आणले. पुस्तकातील १-१७ हे स्थानिक वृक्ष आहेत, तर १८-२६ हे परदेशी पाहुणे आहेत.

शालेय विद्यार्थ्यांना या सर्वांची ओळख व्हावी, पुण्याच्या नकाशातील त्यांचं स्थान कळावं, केवळ यासाठीच हा लेखनप्रपंच!

* **'इन्व्हेझिव' जाती** – काही परदेशी जाती माजल्या सारख्या फोफावतात. या जातींच्या वाढीमुळे अन्य स्थानिक जातींवर अनिष्ट प्रभाव पडतो. तसेच काही जाती नष्टही होतात. अशा जातींना 'इन्व्हेझिव' जाती म्हणतात. उदा. पश्चिमघाटात ब-याचश्या करवंदाच्या जाळ्या आता टणटणींनी व्यापल्या आहेत. बरेचसे तलाव व नद्या जलपर्णी सारख्या वनस्पतींनी व्यापल्या आहेत.

# ऋण निर्देश

कमिन्स नेचर क्लबच्या डॉ. क्रांती यार्दी आणि श्रीमती वैशाली पंडितराव यांनी नोव्हेंबर २००२ मध्ये अशा हरित स्मारकांना ग्रंथरूप देण्याचा प्रस्ताव मांडला. त्याला तात्कालिक कारण घडले ते श्रीमती विनीता देशमुख यांच्या 'इंडियन एक्स्प्रेस' मधील ग्रीन हेरिटेज या लेखामुळे आणि पर्यावरण शिक्षण केंद्राच्या श्रीमती संस्कृती मेनन, भारतीय सांस्कृतिक व कला निधी (इन्टॅक), डॉ. निर्मला पंडित, डॉ. परिमल चौधरी आणि प्राज फाउन्डेशन यांनी या प्रकल्पाला मूर्त रूप दिले. या सर्वांचे मनःपूर्वक धन्यवाद. तसेच आघारकर संशोधन संस्थेचे संचालक, तसेच वनस्पतिशास्त्रविभाग प्रमुख यांनी छायाचित्रे वापरण्यास अनुज्ञा दिली याबद्दल त्यांचेही आभार !

जानेवारी २००५

**डॉ. विनया घाटे**
**डॉ. हेमा साने**

# अनुक्रमणिका

---

प्रत्येक वृक्षाचे साधारण ठिकाण ह्या पुस्तकाच्या शेवटी दिलेल्या नकाशावर दाखविलेले आहे व त्या नकाशातील संदर्भ क्रमांक त्या त्या वृक्षाच्या माहिती मध्ये दिलेले आहे.

# वृक्ष-अवलोकन करताना

वृक्ष-परिचयाचे कार्यक्रम पुणेकरांना नवीन नाहीत. कै. डॉ. वा.द. वर्तकांनी या लोकाभिमुख कामाचा पायंडा घालून दिला आणि आजही असे कार्यक्रम विविध संस्थांमार्फत राबविण्यात येतात. अशा कार्यक्रमांचा उद्देशच मुळी समाजामध्ये वनस्पतींविषयक आस्था निर्माण व्हावी आणि त्यातून वृक्ष-संवर्धन व्हावे. या कार्यक्रमांमध्ये माहिती सांगताना वृक्षाचे प्रचलित नाव, शास्त्रीय नाव, नावाची उत्पत्ती, वृक्षाचे उगमस्थान, ढोबळमानाने लक्षात राहील असे वर्णन आणि काही महत्त्वाचे उपयोग यावर भर दिलेला असतो.

बरेचदा अशा कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेले उत्साही प्रेक्षक स्वतंत्रपणे फिरताना एखादा वेगळा वृक्ष दृष्टीस पडला तर वनस्पती तज्ञांना फोन करतात. मात्र बरेचदा त्यांना वृक्षाचे नीट वर्णन सांगणे जमत नाही किंवा त्यांनी ते व्यवस्थित पाहिलेले नसते. अगदी त्रोटक आणि अपु-या माहितीवरून तज्ञ नाव किंवा त्या वृक्षाची माहिती देऊ शकत नाही. म्हणून वृक्ष-निरीक्षणास आवश्यक बाबींचा आपण थोडक्यात विचार करूया ज्यामुळे वृक्ष प्रेमींचे कुतूहल आणि माहिती मिळविण्याच्या प्रयत्नास साथ मिळू शकेल.

वनस्पती-निरीक्षणास अत्यंत आवश्यक बाबी म्हणजे एक उत्साही मन, दोन भक्कम पाय, एक नोंदवही आणि एक छोटेसे भिंग. वृक्षांच्या निरीक्षणासाठी एक चांगली दुर्बिण असल्यास उत्तम, कारण वृक्ष उंच असल्यास पाना-फुलांची रचना, आकार आणि रंग यांचे अवलोकन नुसत्या डोळ्यांनी होऊ शकत नाही.

एखादी अनोळखी वनस्पती किंवा वृक्ष ओळखून त्याची माहिती मिळवायची असल्यास खालील गोष्टींचे टिपण असणे आवश्यक आहे.

- वृक्षाचा प्रकार (पानगळी/सदाहरीत), विशिष्ट आकार, उंची, पसारा आणि वेगळेपण.
- खोड, फांदया, पाने, फुले, फळे यांचा प्रकार, आकार, आकारमान, रचना, रंग आणि रूप.

  उदा. : खोड - गुळगुळीत/खरखरीत/काटेरी/खवल्यांचे.

  पाने - संयुक्त/साधी, समोरासमोर/एकांतरीत, गोल/अंडाकृती/हृदयाकृती/लांबट

  फुले - तु-यांनी येणारी/एकएकटी/पाकळ्या किती, रंग कोणता.
- वृक्षाच्या पानझडीचा/फुलण्याचा/फळण्याचा काळ.
- वृक्ष पाहिला त्या जागेचे वर्णन, जवळपासच्या खाणाखुणा, आजुबाजूला तसेच आणखी काही वृक्ष आहेत का? असल्यास किती?
- वृक्ष पाहिल्याची तारीख, वार, महिना, वर्ष.

या आणि अशा सुयोग्य टिपणांमुळे वृक्षाचे नाव शोधणे सोपे बनते आणि एकदा नाव कळलं की, त्या वृक्षाची बाकी माहिती, उपयोग वगैरे मिळविणे शक्य होते. अर्थातच याला सुद्धा वनस्पती-तज्ज्ञांची मदत तितकीच महत्त्वाची आहे.

# वृक्ष संवर्धनासाठी थोडे



दुर्मिळ वृक्षांवर ही पुस्तिका काढण्याचे दोन मुख्य उद्देश होते. एक आपल्या शहरातील 'ग्रीन हेरीटेज' अर्थात दुर्मिळ आगळ्या-वेगळ्या आणि महत्त्वपूर्ण वृक्षांबद्दल माहिती वृक्षप्रेमींपर्यंत पोहोचवणे आणि दुसरा म्हणजे त्यांच्या संरक्षण/संवर्धनासाठी योग्य ती पाऊले उचलणे. संरक्षणाची जबाबदारी महानगरपालिकेबरोबर आपल्यासारख्या वृक्षप्रेमींचीही आहे. संवर्धनासाठी मात्र त्या वृक्षांची फळं वा बिया जमा करून त्यांचा व्यवस्थित अभ्यास करून त्यापासून रोपे करून ठिकठिकाणी वाढविण्याची मोहीम हाती घेणे आवश्यक आहे. अर्थात हे काम अतिशय अवघड आहे. प्रत्येक वृक्षसंगोपनासाठी वेग-वेगळा अभ्यास आवश्यक असतो एखाद्या वृक्षाचे बी लगेच रूजते तर एखाद्याला खूप वेळ लागतो कधी कधी बिया रूजविण्यापूर्वी त्यावर काही उपचार करावे लागतात. त्यामुळे हे काम वनस्पती शास्त्र अभ्यासकांवर सोपविल्यास बिया व त्यावरील कष्ट वाया न जाता अशा दुर्मिळ वृक्षांचे संगोपन चांगल्यारीतीने होऊ शकेल.

# १. उंडी



मध्यम आकाराचा हिरवागार सुंदर वृक्ष, कोकणात सागर किनारपट्टीतील वाळूत वन्य आढळतो. हिरवीगार तुकतुकीत देखण्या, समांतर पर्णशीरा असलेली पाने हेच या झाडाचे वैशिष्ट्य. बियांमधील तेलामुळे आजकाल या वृक्षाला महत्त्व प्राप्त झाले आहे.



**नाव :** उंडी

**शास्त्रीय नाव :** *Calophyllum inophyllum* L.

कॅलोफायलम् इनोफायलम्

**Family** : Clusiaceae

**कुल :** सुरंगी/कोकम

**नावाची उत्पती :** कॅलोफायलम् म्हणजे सुंदर पाने, इनोफायलम् - देखण्या, दो-यासारख्या पर्णशिरा असणारी पाने.

**आढळ :** पूर्व आणि पश्चिम किनारपट्टी समुद्राजवळ वन्य आढळणारा वृक्ष.

**खोड :** बुंधा काळसर, गुळगुळीत, फांद्यांतून पिवळा चीक.

**पाने :** मांडणी - समोरासमोर, साधी लांबट गोल, रुंदी जास्त, पोत - चांबट, रंग - चकचकीत हिरवा, मध्यशिरेपासून निघणा-या दुय्यम शिरा सुस्पष्ट समांतर धावणा-या, पाने - अत्यंत देखणी.

**फुलोरा :** पानांच्या बेचक्यातून, अनियमित विरळ गुच्छ.

**फुले :** उभयलिंगी अथवा एकलिंगी, पांढरी, सुवासिक, पुंकेसर अनेक, पिवळट शेंदरी.

**फळे :** आवळ्याएवढी मोठी, गोल गरगरीत, पिकल्यावर पिवळी, गरयुक्त, गरात एकच बी.

**बी :** भरपूर तेल असलेले.

**हंगाम :** फुले - मार्च ते जून.

फळे : ऑक्टोबरपासून.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** लाकडाचा उपयोग होडीचे सुकाणु बनवण्यासाठी होतो; बियांपासून तेल काढतात.

**ठिकाण :** आबासाहेब गरवारे महाविद्यालय - वनस्पतिशास्त्र उद्यान (AA-1).

## २. सातवीण



हा एक सदाहरित जंगलात आढळणारा प्रचंड वृक्ष आहे. पूर्वीच्या काळी खोडापासून धूळपाटी बनवत. पश्चिम बंगालमधील शांतिनिकेतनच्या पदवीदान समारंभात प्रत्येक स्नातकाला सातविणीची फांदी देण्याची प्रथा आहे.



**नाव :** सातवीण

**शास्त्रीय नाव :** *Alstonia scholaris* (L) R. Br.

अलस्टोनिया स्कॉलॅरिस

**Family** : Apocynaccae

**कुल :** करवीर

**नावाची उत्पत्ती :** अलस्टोन नावाच्या वनस्पती शास्त्रज्ञाच्या गौरवार्थ याचे नाव अलस्टोनिया असे करण्यात आले. पूर्वी यापासून पाट्या बनवत म्हणून स्कॉलॅरीस असे विशेषण मिळाले.

**आढळ :** भारतातील सदाहरित जंगलात

**खोड :** उभ्या अक्षात खोडाला वळ्या, फांद्यांवर पांढरे ठिपके. फांद्या एकाच पातळीत त्यामुळे एखाद्या विशाल दीपमाळेसारखा दिसतो.

**पाने :** एका पेरापासून साधारण ७ पाने येतात. पाने साधी, चांबट, भालाकृती, वरचा पृष्ठभाग चकचकीत, हिरवा, खालचा थोडा पांढुरका, फांद्या व पाने तोडल्यावर चीक येतो.

**फुलोरा :** छत्राकार झुपक्यांचा.

**फुले :** फुलांचे आकारमान अतिशय बारीक, फुले पांढरट हिरवी, अतिशय उग्र वास.

**फळे :** उकलणारी. २-३ सें.मी. व्यासाची, २० सें.मी. लांबीची, जोडीजोडीने येतात.

**बिया :** तपकिरी रंगाच्या, एका टोकाशी लांब केसांचा पुंजका.

**हंगाम :** ऑगस्ट ते ऑक्टोबर.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** ह्या झाडाची साल प्रचंड प्रमाणात औषधासाठी वापरतात. सालापासून क्विनीन-सारखे द्रव्य मिळते. त्याचा उपयोग तापावर होतो.

**ठिकाण :** डे. जिमखाना ऑफिसच्या आवारात (N-2); स.प. महाविद्यालयात (R-2).

# ३. रुद्राक्ष



बंगाल, आसाम, म्यानमार परिसरात वन्य असणारा हा वृक्ष, पश्चिम घाटात दुर्मिळ आहे. मध्यम आकाराचा सदाहरित वृक्ष आहे. हिंदुधर्मात रुद्राक्षाला खूप महत्त्व आहे. हा एक पवित्र वृक्ष मानला जातो. रुद्राक्षाची जी जपमाळ बनवली जाते ते याच झाडाचे फळ आहे.



**नाव :** रुद्राक्ष

**शास्त्रीय नाव :** *Elaeocarpus ganitrus* Roxb.

इलिओकार्पस गनिट्रस

**Family** : Elaeocarpaceae

**कुल :** रुद्राक्ष

**नावाची उत्पत्ती :** Elaeo अर्थात् Olive म्हणजे ऑलिव्ह, Karpus म्हणजे फळ, गनिट्रस म्हणजे खाचा असलेला.

**आढळ :** पश्चिम घाटातील दुर्मिळ वृक्ष, आसाम, सिंगापूर, म्यानमार प्रदेशात भरपूर प्रमाणात उपलब्ध.

**खोड :** पसरणा-या फांद्यांची रचना.

**पाने :** रचना एकांतरित, पर्णपाते साधे, भालाकार, पर्णाग्र टोकदार, पाते देठावर खाली पसरणारे.

**फुलोरा :** जुन्या पानांच्या बेचक्यातून, दाट मोहोर.

**फुले :** एकलिंगी वा उभयलिंगी, पिवळसर पांढरी, पुंकेसर अनेक, समूह स्वरूपात.

**फळे :** मध्यम आकारमानाची, गोलाकार किंवा लांबटगोल, निळ्या रंगाची.

**बिया :** फळाची अंतर्साल खडबडीत, त्यावर उभ्या धारा, हेच व्यवहारातले रुद्राक्ष (फळात ४-५ कप्पे, प्रत्येक कप्प्यात एक बी).

**हंगाम :** फुले - जून, जुलै.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** ग्रीन फार्मसी - आवार, अलंकार पोलीस चौकी, कर्वेनगर (I-3).

# ४. कनकचंपा



हा एक छोटेखानी पानगळी वृक्ष आहे. सोनेरी, पिवळी, खोडावर येणारी फुले, लाल-चुटुक त्रिदली पाकळ्यांमध्ये जांभळी-काळी फळे यावरुन वृक्ष ओळखता येतो. देखणा, सौंदर्यवृक्ष म्हणून ह्या झाडाची बागातून लागवड केली गेली.



**नाव :** कनकचंपा

**शास्त्रीय नाव :** *Ochna squarrosa* L.

ऑक्ना स्क्वॅरोसा

**Family** : Ochnaceae

**कुल :** कनकचंपा

**नावाची उत्पत्ती :** Ochne म्हणजे Wild Pear वन्य नाशपती, कारण Ochna ची पाने नाशपतीच्या पानांसारखी असतात.

**आढळ :** उष्णकटिबंधीय, आशिया आणि आफ्रिकेचा मूळ रहिवासी, कोकणवासी वृक्ष.

**खोड :** फिकट तपकिरी, गुळगुळीत.

**पाने :** एकांतरित, देठ नगण्य, उपपर्ण स्पष्ट, पाते साधे, भालाकार, पात्याचा तळ निमुळता होत देठाला भिडणारा, कडा अतिसूक्ष्म दंतुर.

**फुलोरा :** छत्राकृती, छोट्या पर्णहीन फांद्यांवर किंवा जुन्या खोडावर.

**फुले :** सोनेरी पिवळ्या वर्णाची, सुगंधी, निदले लालसर, किंचित ताठर, त्यावर जवळजवळ असणा-या रेषा, पाकळ्या पाच ते बारा, पुंकेसर अनेक, त्यांचे तंतू आखूड, परागकोष मोठाले, त्यांच्या अग्रभागी सूक्ष्म छिद्र, त्यातून परागकण बाहेर पडतात.

**फळे :** निदले लालचुटुक फळाबरोबर राहतात, त्यावर तीन ते सहा काळपट जांभळ्या, काष्ठगर्भी फळांचा समूह.

**हंगाम :** फुले - मार्च ते एप्रिल; फळे - जून; हिवाळ्यात पाने गळतात, फेब्रुवारी, मार्चमध्ये कोवळ्या तांबूस, पानांच्या धुमा-याबरोबरच फुले येतात.

**लागवड :** बियांद्वारे.

**ठिकाण :** शाहू उद्यान (W-4); पुणे-विद्यापीठ वनस्पती उद्यान (A-4).

## ५. वाळुंज



हा एक नद्यांच्या काठावर आढळणारा पानगळी वृक्ष आहे. लेरौँ या फ्रेंच रसायनशास्त्रज्ञाने या वृक्षाच्या सालीपासून १८९२ मध्ये सॅलिसीन नावाचे द्रव्य काढले तेच आपले परिचित औषध ॲस्पिरीन. पोपटी हिरव्या रंगाची पाने मागून चकचकीत पांढरी असतात, त्यामुळे उन्हात चकचकीत दिसतात.



**नाव :** वाळुंज

**शास्त्रीय नाव :** *Salix tetrasperma* Roxb.

सॅलिक्स टेट्रास्पर्मा

**Family** : Salicaceae

**कुल :** वाळुंज

**नावाची उत्पत्ती :** सॅल म्हणजे जवळ आणि लिक्स म्हणजे पाणी. म्हणून पाण्याजवळ वाढणारा तो सॅलिक्स, टेट्रास्पर्मा म्हणजे चार बिया असलेला.

**आढळ :** सामान्यतः दमट प्रदेशात, नद्यांच्या काठावर आढळणारा पानगळी वृक्ष.

**खोड :** काळसर खडबडीत, उभ्या भेगा असलेले, फांद्या काहीशा खाली लोंबणा-या, कोवळ्या फांद्यावर मऊ लव, त्यामुळे रंग राखाडी.

**पाने :** एकांतरित, साधी, भालाकार, कडा सूक्ष्म दंतुर, वरचा पृष्ठभाग निळसर हिरवा, खालचा लवयुक्त, पांढुरका राखाडी त्यामुळे पाने उन्हात चमचमतात.

**फुलोरा :** पिवळ्या रंगांच्या मंजि-या, पानाच्या बगलेतून.

**फुले :** अतिशय बारीक, एकलिंगी. झाडही एकलिंगी.

**फळे :** आकाराने लहान असतात. (पुण्यातला हा वृक्ष नर आहे. म्हणून तो फक्त फुलतो पण फळत नाही).

**बिया :** अगदी बारीक. एका फळात चार बिया असतात.

**हंगाम :** फुले - नोव्हेंबर ते जानेवारी.

**लागवड :** छाट कलमांद्वारे.

**ठिकाण :** चव्हाण पुलाचा कर्वे रोड उतार (N-5).



# ६. पॉपलर



हिमालय-पंजाबमध्ये वन्य वाढणारा पानगळी वृक्ष मोठ्या प्रमाणात लागवडी खालीही दिसतो. पिंपळ आणि पॉपलर या दोन्ही वृक्षांच्या पानात खूप साम्य आहे. दोन्हीच्या पानांना लांब देठ असतो आणि हृदयाकार पात्याचा अग्र शेंडीसारखा लांब असतो. मात्र पॉपलरच्या पानांच्या कडा सूक्ष्म दातेरी असतात.



**नाव** : पॉपलर

**शास्त्रीय नाव** : *Populus sp.*

पॉपलस स्पे.

**Family** : Salicaceae

**कुल** : वाळुंज

**नावाची उत्पत्ती** : Popular ही संज्ञा Paipallo या लॅटिन शब्दापासून घेतली आहे. Populus किंवा Paipallo म्हणजे थरथरणे, हलणे किंवा सळसळणे. वृक्षाची पाने वा-याबरोबर जोरात सळसळतात म्हणून हे नाव.

**आढळ** : हिमालयाच्या पायथ्याशी असलेला डोंगर रांगात वन्य. मात्र पंजाब-हरयाना मध्ये मोठ्या प्रमाणात लागवड करतात.

**खोड** : पांढुरके, जुन्या खोडावरची साल सुरकुतलेली, त्यावर बारीक, पांढ-या त्वक्‌रंध्रांच्या उभ्या ओळी.

**पाने** : काहीशी पिंपळपाना सारखी – तळाशी ३ ते ५ शिरा अतिशय स्पष्ट.

**फुलोरा** : बारक्या, नतकणिशाच्या स्वरूपात.

**फुले** : अतिशय बारीक, एकलिंगी.

**फळे** : अतिशय लहान बोंडे.

**बिया** : पुण्यात अजून नाहीत. कारण पुण्यातील वृक्ष अजून पूर्ण वाढ झालेले नाहीत.

**हंगाम** : फुलोरा, फुले, फळ बी अद्याप पाहण्यात आलेले नाही.

**लागवड** : छाट कलमाद्वारे.

**ठिकाण** : आबा बागूल उद्यान (J-6); सेनापती बापट रस्ता – रस्ता दुभाजकांवर.

## ७. तामण (ताम्हण)



नद्याच्या काठावर विपुल प्रमाणात आढळणारा मध्यम उंचीचा एक पानगळी वृक्ष आहे. हा वृक्ष महाराष्ट्र राज्याचे मानचिन्ह आहे. रस्त्याच्या दुतर्फा लागवडीला योग्य असा हा वृक्ष आहे.



**नाव :** जारूल/तामण

**शास्त्रीय नाव :** *Lagerstroemia flos-reginae* Retz.

लाजर्स्ट्रोमिया फ्लॉस - रेजिनी.

**Family** : Lythraceae

**कुल :** दाडिम

**नावाची उत्पत्ती :** कार्ल लिनियस्‌चा स्विस मित्र लाजरस्ट्रोम याच्या गौरवार्थ दिलेले हे नाव आहे. लाजरस्ट्रोमला कोणीतरी पूर्वेकडील देशातून हे फूल आणून दिले. ते त्याने लिनियस्‌ला दिले. त्या फुलाचे नाव लिनियसने आपल्या मित्राच्या नावावरून तयार केले. फ्लॉस रेजिनी या विशेषणाचा अर्थ पुष्पसम्राज्ञी.

**आढळ :** नदी-ओढ्याकाठी विशेष करून कोकणात विपुल प्रमाणात वाढणारा वन्य वृक्ष.

**खोड :** सरळ वाढणारे, फिकट भुरकट रंगाचे.

**पाने :** पानांची रचना जोडीजोडीने; पाते साधे, काहीसे आंब्याच्या पानासारखे मात्र पोपटी-हिरवे, दुय्यम शिरांच्या १० ते १२ जोड्या, शिरा अतिशय ठळक, गळून पडताना पानांचा रंग तांबूस.

**फुलोरा :** फांद्यांच्या टोकाशी, ठळकपणे जाणवण्या इतका मोठा, जवळजवळ २५ ते ३० सें.मी. लांब व २० सें. मी. रुंद.

**फुले :** गुलाबी ते फिकट जांभळ्या रंगाची, क्वचित लालसर, निदलपुंजाचा पेला अंडाकार, त्यावर स्पष्ट उभ्या शिरा, पाकळ्या क्रेपच्या फुलासारख्या चुणीदार, पुंकेसर असंख्य.

**फळे :** बोंड, निदलांच्या पेल्यात.

**बिया :** बारीक, तपकिरी, टोकाशी बारीक पंख.

**हंगाम :** फुले - एप्रिल ते जून. फळे - जून ते फेब्रुवारी.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** या झाडाचे लाकूड पाण्यातही चांगले तग धरते. म्हणून पाण्याशी सतत संबंध येणा-या लाकडी वस्तू उदा. होड्या बनवण्यास योग्य असे याचे लाकूड आहे. म्यानमारमध्ये सागाखालोखाल महत्त्वाचे लाकूड मानले जाते.

**ठिकाण:** हिराबाई बडोदेकर यांच्या बंगल्या शेजारी (M-7); डॉ. ह.वि. सरदेसाई यांचे निवासस्थान (AB-7); पंडित ऑटोमोबाइल, टिळक रस्ता (Q-7); ज्ञानदा प्रशाला, श्रद्धा हॉस्पिटल कोपरा (I-7).

# ८. तिवस (काळा पळस)



हा ८ ते १५ मीटर उंचीपर्यंत वाढणारा पानगळी वृक्ष आहे. ह्या झाडाच्या फांद्या वेड्या-वाकड्या व ओबड-धोबड असतात. पाने पळसासारखी पण काळपट हिरवी म्हणून काळा पळस. झाडाचे लाकूड चांगल्या प्रतीचे व इमारतीच्या बांधकामास उपयुक्त मानले जाते.



**नाव** : तिवस/काळा पळस

**शास्त्रीय नाव** : *Ougeinia oojeinensis* (Roxb.) Hochr.

उज्जैनिया उज्जैनेन्सिस

**Family** : Fabaceae

**कुल** : पलाश

**नावाची उत्पत्ती** : या वृक्षाचा जो नमुना नि चितीकरणासाठी पाठवण्यात आला तो उज्जैन या प्राचीन शहरातील वृक्षाचा होता. म्हणून वृक्षाचे शास्त्रीय प्रजाती नामकरण उज्जैनिया असे करण्यात आले.

**आढळ** : महाराष्ट्र, गुजराथ, बंगाल, मध्यप्रदेशातील पानझडी जंगलात.

**खोड** : काळपट, खोलवर भेगाळलेले.

**पाने** : एकांतरित, पळसाप्रमाणेच त्रिदली, काळपट हिरवी, चिवट, जाड. पाने काळपट म्हणून हा काळा पळस, पर्णशिरा खालच्या पृष्ठभागावर अधिक स्पष्ट.

**फुलोरा** : जुन्या फांद्यांच्या पेरापासून फुटणारा अत्यंत दाट मोहोर, निष्पर्ण स्थितीत.

**फुले** : अतिशय बारीक, देठ गुलाबी, पाकळ्या गुलाबी पांढ-या, मंद सुवासाची.

**फळे** : अतिशय पातळ शेंगांच्या स्वरूपात, शेंगा-जुळणीयुक्त, काळसर.

**बिया** : प्रत्येक शेंगेत दोन ते पाच बिया.

**हंगाम** : फुले - जानेवारी ते मार्च, पाने गळून गेल्यावर. शेंगा - मे-जून.

**लागवड** : बियांपासून.

**ठिकाण** : पुण्यात फक्त आबासाहेब गरवारे महाविद्यालय वसतिगृह प्रमुखांच्या निवासस्थाना-जवळ (AA-8); कात्रज टेकडीवर नोंद.

# ९. सुरंगी



हा एक मध्यम उंचीचा, पश्चिम किनारपट्टीवर सापडणारा सदाहरित वृक्ष आहे. दक्षिण कोकण, गोवा या ठिकाणी विपुल प्रमाणात आढळतो. फुलांना मोहक वास असल्यामुळे कळ्यांचे गजरे केले जातात. ह्या कळ्या टिकाऊ असतात.



**नाव :** सुरंगी/पुन्नाग

**शास्त्रीय नाव :** *Mammea suriga* Kost.

मामिया सुरीगा

**Family** : Clusiaceae

**कुल :** सुरंगी

**नावाची उत्पत्ती :** ह्या झाडाचे मामिया हे प्रजाति वाचक नाव Mammey या वेस्ट इंडीजमधील स्थानिक नावावरून घेतलेले आहे.

**आढळ :** भारतीय पश्चिम किनारपट्टीवर विशेषतः कोकणात आढळतो.

**खोड :** उंची १०-१५ मीटरपर्यंत, घेर १ ते १.५ मीटर; साल लालसर तपकिरी रंगाची खवल्या खवल्यांची; खोडातून पिवळा चीक व किंचित लाल डिंक पाझरतो.

**पाने :** मांडणी समोरासमोर साधी; रंग तुकतुकीत हिरवा, पृष्ठभाग गुळगुळीत, मध्यरेषा पिवळट, दुय्यम रेषा समांतर – अतिशय जवळजवळ.

**फुलोरा :** गळून पडलेल्या पानांच्या बेचक्यातील गाठीतून फुटतो. फुलांचे झुबके.

**फुले :** एकलिंगी वा उभयलिंगी; कळी लालसर शेंदरी, पाकळ्या पांढ-या, त्यावर केशरी रेषा; पुंकेसर अनेक; फुले सुवासिक.

**फळे :** मांसल गरयुक्त, पिवळ्या रंगाचे, गोलाकार, दोन्ही टोकांना निमुळते.

**बिया :** एकच मोठे, गरात रुतलेले बी.

**हंगाम :** फुले – मार्च-एप्रिल.

फळे – एप्रिल-मे.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** फुलांतील रंग रेशीम रंगवण्यासाठी वापरला जातो.

**ठिकाण :** ग्रीट वेल – डेक्कन जिमखान्यासमोरचा पदपथ – पॉप्युलर बुक हाऊसनजीक (G-9).

# १०. मुचकुंद



हा वृक्ष मध्यम वा मोठ्या आकारमानाचा पानगळी वनात आढळणारा वृक्ष आहे. ह्या झाडाचे लाकूड हलक्या दर्जाच्या फर्निचरसाठी व खेळण्यांसाठी वापरले जाते. पाने वरून काळपट, पोपटी हिरवी आणि खालच्या बाजूने सोनेरी असतात.



**नाव :** मुचकुंद

**शास्त्रीय नाव :** *Pterospermum acerifolium* Willd.

टेरोस्पर्मम् ॲसरीफोलिअम्

**Family** : Sterculiaceae

**कुल :** मुचकुंद

**नावाची उत्पत्ती :** टेरॉसचा अर्थ पंखधारी, स्पर्मम् म्हणजे बिया, टेरोस्पर्मम् हे प्रजाति-वाचक नाम पंखधारी बियांमुळे तर ॲसरीफोलियम् या विशेषणाचा अर्थ ॲसरवृक्षासारखी पाने असलेला.

**आढळ :** भारतात सर्वत्र, पानगळी वनात तुरळकपणे आढळतो.

**खोड :** दहा ते पंधरा मीटर उंच; करड्या रंगाचे, गुळगुळीत, कोवळ्या फांद्यांवर लव.

**पाने :** एकांतरित, साधी, पाते, खूप मोठ्या आकारमानाचे – जवळजवळ १५ x १२ सें.मी. पंजासारखे दिसणारे; देठ मध्याच्या आसपास खालच्या पृष्ठभागावर चिकटलेला; वरचा पृष्ठभाग गडद काळपट हिरवा, खालचा पिवळट पांढरा मऊशार लवयुक्त.

**फुलोरा :** पानांच्या बेचक्यातून एक ते तीन फुलांचा गुच्छ.

**फुले :** सुवासिक, आकारमानाने मोठाली, हाताच्या बोटाएवढी लांब, निदले पिवळट तपकिरी जाड मांसल, बाहेरील पृष्ठभाग लवयुक्त, आतील पांढरा, सोललेल्या केळ्यासारखी, दले पाच, पातळ पांढरी.

**फळे :** पाच कप्प्यांची फुटिर बोंडे, फलावरण कडक, लाकडी, लवयुक्त, प्रत्येक कप्प्यात ब-याच बिया.

**बिया :** बी मोठे, टोकाशी मोठा पातळ, तपकिरी पंख.

**हंगाम :** फुले - फेब्रुवारी ते एप्रिल. फळे - डिसेंबर.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** तुळशीबाग; जहांगीर नर्सिंग होम (X-10); कुमठेकर रोड – महाराष्ट्र राज्य शिक्षण संशोधन संस्था (Q-10); भांडारकर रस्ता – साने डेअरी समोर (K-10); श्रीमती नाथीबाई ठाकरसी शाळेत, नळस्टॉप (C-10).

# ११. सेमला कांचन



मध्यभारत - पंजाब, उत्तर प्रदेशातील वन्य असलेला उंच डेरेदार पानगळी वृक्ष, पावसाळ्याच्या शेवटी पांढ-या-छोट्या-छोट्या फुलांनी गच्च भरला की अतिशय सुंदर दिसतो. पूर्णपणे निष्पर्ण कधीच होत नाही.



**नाव :** सेमला कांचन

**शास्त्रीय नाव :** *Bauhinia retusa* Roxb.

बॉहिनिया रेट्यूसा

**Family** : Caesalpiniaceae

**कुल :** कांचन

**नावाची उत्पत्ती :** बोहिन बंधूंच्या स्मरणार्थ बोहिनीया; पाने रेट्यूस म्हणजे अग्राशी उथळ खड्डा असलेली म्हणून रेट्यूसा.

**आढळ :** उत्तर भारतात वन्य आढळणारा वृक्ष.

**खोड :** डेरेदार, पर्णसंभार भरगच्च. त्यामुळे खोडाचे दर्शन सहजपणे नाही. खोडाची उंची १०-१५ मीटर, घेर जवळजवळ अर्धा ते पाऊण मीटर; लालसर, गडद चॉकलेटी, उभ्या भेगा चिरा असलेली साल.

**पाने :** आकारमान मोठे, जवळजवळ तळहाताहून अधिक, लांबीपेक्षा रुंदी जास्त; दोन खंड तीन-चतुर्थांशाहून अधिक जुळलेले, रंग गडद पोपटी हिरवा.

**फुलोरा :** फांद्यांच्या टोकाशी मोठाले तुरे – त्यात ४ ते ७ फुलांचे गुच्छ.

**फुले :** पिवळसर पांढरी, त्यावर लाल रेषा, हे रूप काहीसे चिंचेच्या फुलांसारखे, पुंकेसर फक्त तीन.

**फळे :** शेंगा पिकल्यावर गडद ताम्रवर्णी लाल; शेंगा पूर्ण जून झाल्यावर जोराने तडकतात आणि त्यातील बिया चौफेर उधळल्या जातात.

**बिया :** चपट्या, खाकी पिवळट रंगाच्या – पंचवीस पैशाच्या नाण्याएवढ्या आकारमानाच्या.

**हंगाम :** फुले – जुलै ते सप्टेंबर. शेंगा – मार्च ते एप्रिल.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** या झाडाच्या डिंकाचा उपयोग औषधासाठी केला जातो. ह्या झाडाचा डिंक सेमलगोंद म्हणून उपयोगात आणतात. झाडाचे लाकूड पेट्या बनवण्यासाठी वापरतात.

**ठिकाण :** आघारकर संशोधन संस्थेचे प्रवेशद्वार (AB-11); शहाडे हॉस्पिटल, मित्र मंडळ वसाहती जवळ (P-11); पाषाण-चांदणी चौक रस्ता (B-11).

# १२. सरल (पाईन)



हे पाईन वृक्ष सूचिपर्णी जंगलातील एक महत्वाचा घटक, एका पातळीत आडव्या पसरणा-या वृक्षाच्या टोकाकडे निमुळत्या होत जाणा-या फांद्यांच्या मुळे या वृक्षाला त्रिकोणी आकार प्राप्त होतो. तीच त्याची ओळख. पानांच्या सुईसारख्या आकारामुळे या प्रजातीला सूचिपर्णी वृक्ष म्हणतात.



**नाव :** पाईन, सरल

**शास्त्रीय नाव :** *Pinus longifolia* Roxb.

पाईनस लाँगिफोलिया

**Family** : Pinaceae

**कुल :** पाईनेसी

**नावाची उत्पत्ती :** Pinus हे फर वृक्षाचे प्राचीन नाव, लाँगीफोलिया म्हणजे लांब पाने असलेला.

**आढळ :** हिमालयात काश्मीरपासून आसामपर्यंत आणि दक्षिणेच्या उंच टेकड्यांवर आढळणारा सदाहरित वृक्ष.

**खोड :** साल जाड, लालसर तपकिरी भेगाळलेली; ढलप्या-ढलप्यांनी गळणारी, एक सुवासिक स्राव भेगातून पाझरतो - हीच राळ असते.

**फांद्या :** स्वरूप केवळ वाढीच्या प्रारंभीच्या काळात. फांद्या दोन प्रकारच्या; दीर्घ आणि आखूड – दीर्घ फांद्यावर फक्त शल्क पर्ण; आखूड फांद्यांच्या तळाशी शल्कपर्णांचे वेष्टन व त्यांच्या टोकाशी तीन लांब पानांचा गुच्छ.

**पाने :** सुयांसारखी. १५ ते २० सें.मी. लांब, ०.५ मि.मि. रुंद, चकाकीत हिरवी.

**फुलोरा :** पाईनला शंकू येतात. नरशंकू आणि बीजशंकू.

**फळे :** या वृक्षाला फळे नसतात. अनावृत्तबीजी प्रकारची आहे. बीज शंकूत असतात.

**बिया :** पातळ पंखधारी पुण्यात क्वचितच आढळतात.

**हंगाम :** मूळचा हिमालयाच्या प्रदेशात वाढणारा येथील हवामानामुळे बिया पुण्यात फारशा आढळत नाही.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** शोभिवंत वृक्ष.

**ठिकाण :** आबासाहेब गरवारे महाविद्यालयात (AA-12); जोशी बंगला - कमला नेहरू उद्याना जवळ (L-12); मोघे निवास - मयूर कॉलनी (D-12).

# १३. ॲक्रोकार्पस (रेड सेडर)



हा एक उंचच उंच वाढणारा पानगळी वृक्ष आग्नेय-आशिया व आसाम-बंगाल, पश्चिम घाटात वन्य आढळणारा. याची शोभिवंत वृक्ष म्हणून उद्यानात मुद्दाम लागवड केली जाते. कोवळी पाने लाल-चुटुक आणि झाडाच्या टोकाला येणा-या पंखधारी शेंगा हेच त्याचे वैशिष्ट्य. सध्या महाराष्ट्र राज्य वनीकरण खाते यांनी या वृक्षाची लागवड हाती घेतली आहे.



**नाव :** अॅक्रोकार्पस (रेड सेडर)

**शास्त्रीय नाव :** *Acrocarpus fraxinifolius* W. & A.

अॅक्रोकार्पस् फ्रॅक्सिनीफोलिअस

**Family** : Caesalpiniaceae

**कुल :** कांचन

**नावाची उत्पत्ती :** अक्रोस म्हणजे अग्राकडचा किंवा सर्वोच्च व कार्पस म्हणजे फळे. फ्रॅक्सीनीफोलिअस् या विशेषणाचा अर्थ फ्रॅक्सिनस या वृक्षाच्या पानासारखी पाने असणारा असा.

**आढळ :** आसाम-बंगाल, पश्चिम भारतात वन्य तथा लागवडी खाली.

**खोड :** खाली खूप रुंद, त्याला आधार देणारी खास बट्रेस प्रकारची मुळे, खोड टोकाकडे निमुळते होत जाणारे, फांद्या खोडाच्या १५ मीटर उंचीनंतरच.

**पाने :** एकांतरित, अतिशय मोठाली, संयुक्त द्विपिच्छिल, पर्णिका दहा ते बारा; लांबट कोवळी पाने लालबुंद, जुनी पोपटी, हिरवी.

**फुलोरा :** पानांच्या बेचक्यातून मोहोर, अतिशय दाट.

**फुले :** आकारमानाने अतिशय लहान, भगवी शेंदरी, पाच पुंकेसर, पाकळ्यांमधून बाहेर डोकावणारे.

**फळे :** पातळ चपट्या पंखधारी शेंगा, त्यांचा देठ लांबट.

**बिया :** प्रत्येक शेंगेत अनेक लंबगोलाकार बिया.

**हंगाम :** फुले - निष्पर्ण अवस्थेत, फेब्रुवारीत नवीन पाने; फळे - मार्च पासून; शेंगा तयार होण्यास ६-८ महिने लागतात.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** पुणे विद्यापीठ वनस्पती-शास्त्रीय उद्यानात (A-13); आघारकर संशोधन संस्थेत (AB-13).

# १४. सीतेचा अशोक



हा एक मध्यम आकाराचा सदाहरित वृक्ष आहे. रामायणात सीतेला रावणाने ज्या वनात ठेवले होते, तिथे बरीच अशोकाची झाडे होती. म्हणूनच याला सीतेचा अशोक म्हटले जात असावे. ह्या झाडाची पालवी लाल रंगाची व लोंबती असते. फुलांचे गुच्छ गडद लाल रंगाचे असतात व बहरलेले झाड खूप सुंदर दिसते.



**नाव :** सीतेचा अशोक

**शास्त्रीय नाव :** *Saraca asoaca* (Wall.) de Wild

सराका आसोका

**Family** : Caesalpiniaceae

**कुल :** बहावा

**नावाची उत्पत्ती :** सराका हे नाव अशोक या संस्कृत नावाचा अपभ्रंश. अशोक म्हणजे ज्याला शोक नाही असा – आनंदी.

**आढळ :** हिमालयापासून कन्याकुमारी पर्यंत सदाहरीत जंगलांमध्ये वन्य. उद्यानांमध्ये लागवडी खाली.

**खोड :** भरपूर फांद्या फुटणारे, काळसर रंगाचे, खडबडीत.

**पाने :** एकांतरित, संयुक्त; कोवळी पाने तांब्यासारखी लाल व खाली लोंबणारी, जुनी ताठ, गडद हिरवी, पर्णिकांच्या ३-६ जोड्या.

**फुलोरा :** जुन्या खोडांवर व फांद्यांवर, पर्णहीन भागात येतात. फुलांचे गुच्छ लगडतात.

**फुले :** कोवळी असताना रंग पिवळा व जून झाल्यावर लालसर शेंदरी, फुलांना अस्सल पाकळ्या नसतात. लालसर दिसणारा भाग निदलपुंजाचा असतो.

**फळे :** शेंगा चपट्या १० -२० सें.मी. लांब व ३-५ सें.मी. रुंद, काळपट तांबड्या रंगाच्या, लवयुक्त.

**बिया :** २ ते ५ तपकिरी रंगाच्या.

**हंगाम :** एप्रिल ते ऑक्टोबर.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** ह्या झाडाच्या साली पासून स्त्रियांच्या विविध रोगांवर औषध बनवले जाते. झाडाची साली विंचू दंशावर उपयोगी.

**ठिकाण :** पुण्याच्या एम्प्रेस गार्डन (V-14) सारख्या मोठ्या उद्यानांमध्ये, काही कॉलेज तसेच बंगल्यांमध्ये हौशीने लावलेला आढळतो.

# १५. गोरक्षचिंच



उंच वेडावाकडा वाढणारा पानगळी वृक्ष आहे. ह्या झाडाचे खोड अति प्रचंड असते आणि अत्यंत विचित्र आकारमान धारण करते. प्रचंड आकारमानाप्रमाणे त्याचे आयुष्यही भरपूर असते. ह्या झाडाचे परागीभवन वटवाघळांमुळेच होत असल्याच्या नोंदी आहेत.



**नाव :** गोरक्षचिंच

**शास्त्रीय नाव :** *Adansonia digitata* L.

अॅडनसोनिया डिजिटाटा

**Family** : Bombacaceae

**कुल :** शाल्मली

**नावाची उत्पत्ती :** अॅडनूसन या फ्रेंच शास्त्रज्ञाच्या स्मरणार्थ या झाडाला अॅडनसोनिया हे नाव मिळाले डिजिटाटा म्हणजे हाताच्या बोटासारखे. याचा संदर्भ पानांशी आहे.

**आढळ :** पानगळी जातीच्या भारतातल्या जंगलात.

**खोड :** २५ मी. पर्यंत वाढणारा वृक्ष. खोड अत्यंत विचित्र आकारमानाचे. घेर ३० मी. इतका प्रचंड. त्यामुळे एकूणच स्वरूप फार मजेदार, झाडाची साल गळून पडत नाही.

**पाने :** मोठाली, लांब दांड्यावर, त्यांना पाच पर्णिका असतात.

**फुले :** एकएकटी पांढ-या रंगाची १५ सें.मी. व्यासाची व लांब दांड्यावर खाली लोंबणारी. मध्यावर जांभळट पुंकेसराचा स्तंभ. फुले रात्री उमलतात. त्यामुळे परागीभवन वाटवाघळा-मार्फत होत असावे.

**फळे :** लांब दांड्यांवर लोंबणारी, वजनदार, लांबट आकाराची, रंग मातकट हिरवा, पृष्ठभाग खडबडीत, कवच कठीण, बिया गरात रुतलेल्या. माकडे हा गर आवडीने खातात म्हणून या झाडाला आफ्रिकेत माकडाची भाकरी असे म्हणतात.

**बिया :** गरामध्ये रुतलेल्या असतात.

**हंगाम :** फुले – एप्रिल-मे.

**लागवड :** बियांपासून.

**उपयोग :** फळाच्या गरात मॅलिक, टार्टारिक व अॅस्कॉर्बिक आम्ले असतात. म्हणून यापासून चांगले सरबत होते. गोरक्षचिंचावलेह नावाचे पित्तशामक औषध बनवले जाते. आफ्रिकेत व ऑस्ट्रेलियात झाडाच्या ढोलीचा उपयोग घरासारखा होतो.

**ठिकाण :** पुणे विद्यापीठ (A-15); टिळक रोड - अभिनव कला महाविद्यालयासमोरील कोपरा (S-15).

# १६. कदंब



हा एक उंच वाढणारा पानगळी वृक्ष आहे. या वृक्षाचा संदर्भ रामायणात-महाभारतात देखील सापडतो. रस्त्याकडेने लागवडीसाठी हा वृक्ष चांगला आहे. बॅडमिंटनच्या चेंडूसारखी दिसणारी सुंदर पिवळसर फुले आणि विशिष्ट आकारात पसरणा-या फांद्या हे वृक्ष विशेष.



**नाव :** कदंब

**शास्त्रीय नाव :** *Anthocephallus kadamba* (Roxo.) miq.

अॅन्थोसिफायलस कदंब

**Family** : Rubiaceae

**कुल :** कदंब कुल

**नावाची उत्पत्ती :** Anthos म्हणजे फूल व kephale म्हणजे डिंक याचा संदर्भ याच्या फुलांशी आहे. गेंदाप्रमाणे ते दिसते. Kadamb स्थानिक नावावरून घेतलेले नांव.

**आढळ :** उंच वाढणारा पानगळी वृक्ष; शोभिवंत वृक्ष म्हणून लावतात.

**खोड :** सरळसोट वाढणारे, साल अखंड, राखाडी, फांद्या एकाच आडव्या थरात येणा-या म्हणून रचना एखाद्या दीपमाळे सारखी.

**पाने :** सम्मुख, आकारमानाने मोठी, १५ सें.मी., ५-७ सें.मी. रुंद - भाल्या सारखी, शिरा सुस्पष्ट, दोन कोवळ्या पानाच्या मध्ये सुस्पष्ट गोलाकार - २५ पैशाच्या नाण्याएवढी मोठी दोन उपपर्णे; नंतर ती गळून पडतात.

**फुलोरा :** फुलांचे चेंडूसारखे गोल गेंद. टेबल टेनिसच्या चेंडूच्या आकाराएवढे, रंग पिवळट केशरी.

**फुले :** प्रत्येक फूल अतिशय बारीक. पूर्ण वाढलेल्या फुलातून पुंकेसर व कुक्षी बाहेर आलेले दिसतात.

**फळे :** संपूर्ण गेंदाचेच फळ होते. छोट्या संत्र्याएवढे.

**हंगाम :** जून ते ऑक्टोबर.

**लागवड :** छाटकलमाद्वारे किंवा बियांपासून.

**उपयोग :** पक्षी फळे खातात पण फारशी चविष्ट नसतात. रस्त्या-कडेने लागवडीसाठी.

**ठिकाण :** कर्नाटक हायस्कूल (O-16); आघारकर संशोधन संस्था (AB-16).

## १७. शमी



हा एक साधारण उंच वाढणारा सदाहरित वृक्ष आहे. हिंदूधर्मामध्ये या झाडाला खूप महत्त्व आहे. या झाडाची पाने कित्येक सणांना पत्री म्हणून वापरली जातात. शमीला राजस्थानचा कल्पवृक्ष मानतात. त्याचे लाकूड जळाऊ आहे.



**नाव :** शमी

**शास्त्रीय नाव :** *Prosopis specigera* L.

प्रोसोपिस स्पिसिजेरा

**Family** : Mimosaceae

**कुल :** शमी

**नावाची उत्पत्ती :** Prosopis या नावाचा अर्थ मुखवटा व Spigel नावाचा १६ व्या शतकातील डॉक्टर होता. त्याच्या गौरवार्थ Spicigera हे नाव मिळाले.

**आढळ :** साधारण शुष्क प्रदेशात आढळतो.

**खोड :** फांद्या शिडशिडीत, काटेरी, काटे जवळजवळ ५ ते ७ सें.मी. लांबीचे, काहीसे वक्र.

**पाने :** एकांतरित, संयुक्त, पिच्छा-कृती, दुय्यम अक्षाच्या दोनच जोड्या; त्यावर पर्णिकांच्या ७ ते १२ जोड्या, आकारमान अतिशय लहान, रंग राखाडी.

**फुलोरा :** मंजि-यांच्या स्वरूपात - ८ ते १० सें.मी. लांब, फांद्यांच्या टोकाशी किंवा पानांच्या बगलेत.

**फुले :** अतिशय बारीक पिवळट - हिरव्या रंगाची, पुंकेसर १०, दलापेक्षा लांबीला जास्त, त्यामुळे फुलाचा अधिक जाणवणारा भाग.

**फळे :** शेंगा १०-२० सें.मी. लांबीच्या.

**बिया :** १०-१५ चपट्या.

**हंगाम :** डिसेंबर ते मार्च.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** गुपचुप गणपती मंदिर (Z-17);
टोळ हॉस्पिटल शेजारी (I-17);
मित्र-मंडळ कॉलनीतील एका बंगल्यात (P-17).

# १८. बृहत्पर्णी सातवीण



पेनांग-जावा प्रदेशातील मूळचा वृक्ष; भारतात सौंदर्यवृक्ष म्हणून आयात झाला. मात्र अजूनही काही मोठ्या शहरातील बागांमध्येच आढळतो. पोपटी हिरवी मोठी पाने, मंद सुवासिक पांढ-या फुलांचे गुच्छ आणि अगदी बारीक, शिडशिडीत, दोरीसारख्या खाली लोंबणा-या शेंगा ही या वृक्षाची वैशिष्ट्ये.



**नाव :** बृहत्पर्णी सातवीण

**शास्त्रीय नाव :** *Alstonia macrophylla* Wall.

अल्स्टोनिया मॅक्रोफायला

**Family** : Apocynaceae

**कुल :** करवीर

**नावाची उत्पत्ती :** अल्स्टोन नावाच्या वनस्पति - अभ्यासकाच्या गौरवार्थ - अल्स्टोनिया मॅक्रोफायला - मोठाली पाने असणारा.

**आढळ :** मूळचा मलायातील वृक्ष, भारतात ब-याच ठिकाणी चांगला रुळलेला.

**खोड :** गुळगुळीत, राखाडी रंगाचे, फांद्या भरपूर, एकाच पातळीत, तळाकडच्या लांब, टोकाकडच्या आखूड.

**पाने :** एका पेरावर सामान्यतः तीन ते चार, पाते साधे, आकारमानाने बरेच मोठे, जवळजवळ २० सें.मी. लांब, चकचकीत हिरवे, खालचा पृष्ठभाग पांढुरका.

**फुलोरा :** पानांच्या बेचक्यात, तसेच फांद्याच्या टोकाशी विरळ गुच्छांच्या स्वरूपात.

**फुले :** पांढरी, मंद सुवासिक, अतिशय लहान आकारमानाची, पाच दलांची नलिका, त्यात पाच, भालाकार पुंकेसर दडलेले.

**फळे :** प्रत्येक फुलापासून फलिकांची एक जोडी, फलिका स्फुटनशील, शिडशिडीत, दोरीसारख्या जवळजवळ ३० सें.मी. पर्यंत लांब, प्रथम हिरव्या, नंतर तपकिरी. या लोंबणा-या फलिकामुळे झाड दुरूनही ओळखता येते.

**बिया :** प्रत्येक फलिकेत असंख्य बिया, बीच्या अंगभर तपकिरी केसांचे पुंजके.

**हंगाम :** फुले - जुलै ते सप्टेंबर.

फळे - जवळजवळ मार्चपर्यंत.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** पुणे विद्यापीठात चंद्रशेखर ऑडिटोरियमच्या दारात नवीन लावलेला (A-18); शंकरशेट रोड - गुलटेकडीकडे जाणारा रस्ता, चंदन हॉटेल पलीकडे, बँक ऑफ बडोदाच्या दारात (T-18); आघारकर संशोधन संस्थेच्या आवारात (AB-18); बायफ - वारजे येथे.

# १९. कांचनराज



हा एक छोटेखानी पानगळी वृक्ष आहे, मात्र संपूर्णपणे निष्पर्ण कधीच होत नाही. शोभेचा वृक्ष म्हणून जास्त परिचित आहे कारण फुलांचा रंग फारच सुंदर असतो. फुलांचा रंग व आकार ऑर्किडसारखा असल्यामुळे ह्या वृक्षाला आर्किडवृक्ष असेही नाव आहे.



**नाव :** कांचनराज

**शास्त्रीय नाव :** *Bauhinia blackeana* Dunn.

बॉहिनिया ब्लॅकियाना.

**Family** : Caesalpiniaceae

**कुल :** कांचन

**नावाची उत्पत्ती :** कॅस्पर बॉहिन आणि जॉन बॉहिन या दोन बंधूंच्या गौरवार्थ बॉहिनीया हे प्रजातिवाचक नाव या वृक्षाला देण्यात आले आहे. कारण या वृक्षाची पाने ही द्विखंडी, जुळी असल्यासारखी दिसतात.

**आढळ :** उष्णकटिबंधीय पानगळी वृक्ष.

**खोड :** मध्यम उंचीचे, फिकट चॉकलेटी, विरळ, गुठळ्याधारी (warty), फांद्या पसरट.

**पाने :** द्विदलीय, एकांतरित मोठाली, जवळजवळ तळहाताएवढी, लांबीला कमी, रुंदी अधिक; खंड अर्ध्यापेक्षा अधिक जुळलेले.

**फुलोरा :** फांद्यांच्या टोकाशी, खालून वर फुलत जाणारा विरळ गुच्छ.

**फुले :** ऑर्किडच्या फुलांचा भास निर्माण करणारी म्हणून ऑर्किड वृक्ष असे सामान्य नाव. फुले मोठी, गडद गुलाबी, राणी वर्णाची, ५ सुट्या पाकळ्यांची रचना पंख्यासारखी, मधली पाकळी अधिक उठावदार, त्यावर उभ्या रेषांची नक्षी.

**फळे :** पुण्यात याचे मोजकेच वृक्ष आहेत; परागीभवन घडून येत नाही. म्हणून फलधारणा होत नाही.

**हंगाम :** पावसाळ्यात फुलांचा प्रारंभ ऑक्टोबर-नोव्हेंबर पूर्ण बहर.

**लागवड :** गुटी अथवा दाब कलमाद्वारे. मात्र हे प्रयोग यशस्वी होण्याचे प्रमाण कमी म्हणून 'कांचनराज'ची संख्या अगदीच नगण्य.

**ठिकाण :** आघारकर संशोधन संस्था - प्रवेशद्वारा जवळ (AB-19); एम्प्रेस गार्डन (V-19).

# २०. श्वेत कांचन



छोटेखानी पानगळी वृक्ष, संपूर्ण निष्पर्ण होत नाही. सौंदर्यवृक्ष म्हणून आयात झाला असावा. मोठी झुबक्याने येणारी पांढरी फुले आणि फुलांमधील लाल-चुटुक पुंकेसर हे वृक्ष विशेष. फुले नसताना वृक्ष विशेष लक्ष वेधत नाही.



**नाव :** श्वेत कांचन

**शास्त्रीय नाव :** *Bauhinia hookeri* F. Muell.

बॉहिनिया हुकेरी

**Family** : Caesalpiniaceae

**कुल :** कांचन

**नावाची उत्पत्ती :** कॅस्पर बॉहिन आणि जॉन बॉहिन या दोन बंधूंच्या गौरवार्थ बॉहिनिया हे प्रजातिवाचक नाव या वृक्षाला देण्यात आले आहे. कारण या वृक्षाची पानेही द्विखंडी, जुळी असल्यासारखी दिसतात. हुकेरी हे जातिविशेषणही हूकर या वनस्पतिशास्त्रज्ञाच्या गौरवार्थ वापरले आहे.

**आढळ :** मूलस्थान ऑस्ट्रेलिया, पानगळी वृक्ष, आपल्याकडे बागांमध्ये क्वचित सापडणारा.

**खोड :** मध्यम जाडीचे, वेडे-वाकडे; खोडाचा रंग गडद राखाडी, साल खवल्याखवल्यांची, फांद्या विरळ खाली उतरणा-या.

**पाने :** एकांतरित, मध्यम आकारमानाची, द्विखंडी, मळकट हिरवी, चांबट, जाड, कोवळी पाने पातळ, ताम्रवर्णी लाल.

**फुलोरा :** ५-७ फुलांचा गुच्छ, पानाच्या बेचक्यातून आणि छोट्या फांद्यांच्या टोकाशी, सर्व फुले एकाच पातळीत येतात.

**फुले :** पांढरी शुभ्र, पाच मोठ्या पाकळ्या, फुलांना मंद वास, फुलांचा सर्वांत देखणा भाग म्हणजे बाहेर डोकावणारे लाल चुटूक पुंकेसर.

**फळे :** जाड शेंगा, शेंग उकलली तरी बिया उधळल्या जात नाहीत.

**बिया :** प्रत्येक शेंगेत पाच ते नऊ बिया, लाल चॉकलेटी वर्णाच्या, अतिशय टणक.

**हंगाम :** फुले - जवळजवळ वर्षभर पण पावसाळ्यात अधिक प्रमाणात. शेंगा - फेब्रुवारी ते मार्च.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** प्रा. कोल्हटकरांनी ऑस्ट्रेलियाहून हा वृक्ष प्रथम पुण्यात आणला; आज आघारकर संशोधन संस्थेच्या आवारात एक वृक्ष आहे (AB-20).

# २१. सीतारंजन



हा मध्यम उंचीचा पानगळी वृक्ष आहे. मूळचा वेस्ट इंडीजचा रहिवासी; पण काही हौशी लोकांमुळे तो अनेक ठिकाणी लावला. सप्टेंबर-नोव्हेंबर दरम्यान पांढरी नाजूक, मंद सुवासिक फुले असलेले उलटे लोंबणारे तुरे. या वृक्षाचा आणखी एक विशेष म्हणजे याची काहीच पाने लालबुंद होतात. ह्या झाडाचा उपयोग शोभेचा वृक्ष म्हणून केला जातो.



**नाव :** सीतारंजन

**शास्त्रीय नाव :** *Citharexylum subserratum* Sw. सिथॅरेझायलम् सबसिरॅटम्.

**Family** : Verbenaceae

**कुल :** साग

**नावाची उत्पत्ती :** मूळ शब्द Cithara म्हणजे फिड्ल आणि Xylum म्हणजे काष्ठ – या वृक्षाचे लाकूड फिड्ल तयार करण्यासाठी वापरतात. Subserratum किंचित दातेरी पर्णकडा असणारा.

**आढळ :** मूळचा वेस्ट इंडीजचा रहिवासी, भारतात शहरवासी आहे.

**खोड :** उंची – दहा मीटरपर्यंत, फांद्या – काहीशा चौकोनी, झुलणा-या, लोंबत्या.

**पाने :** मांडणी समोरासमोर, पाने साधी भालाकृती, दोन्ही टोकांना निमुळती.

**फुलोरा :** फांद्यांच्या टोकाशी, लोंबते तुरे.

**फुले :** लहान, नाजूक, पांढरी सुवासिक, अंदाजे एक सें.मी. व्यासाची.

**फळे :** सहसा आढळत नाहीत.

**बिया :** आढळत नाहीत. कारण हा मूळचा भारतीय वृक्ष नाही. परागीभवन होत नाही व त्याचे मध्यस्थ देखील माहीत नाहीत.

**हंगाम :** जवळजवळ वर्षभर, जास्त पावसाळा संपताना.

**लागवड :** छाट कलमाद्वारे.

**ठिकाण :** तुळशीबाग; राज्यशिक्षण संशोधन संस्था - कुमठेकर रोड (Q-21); सेनापती बापट मार्ग – 'तीज'च्या दारात (F-21); शिवाजी पुतळा – कोथरूड, वारजे रोड (D-21); कमला नेहरू उद्यानाजवळ – घोडके पेढेवाले यांच्या बंगल्याच्या दारात (L-21).

# २२. क्लाईनोव्हिया



हा एक मध्यम उंचीचा डेरेदार असा, सदाहरित, शोभेचा वृक्ष आहे. हृदयाकार विशिष्ट प्रकारच्या शिरा असलेली पाने आणि फांद्यांच्या टोकाला गच्च तु-यानी आइस्क्रिम गुलाबी येणारी फुले यावरून वृक्ष ओळखता येतो. पाच धारा असलेली फुगीर बोंडे हाही झाडाचा आणखी एक विशेष.



**नाव :** क्लॉइनोव्हिया

**शास्त्रीय नाव :** *Kleinhovia hospita* L.

क्लाईनोव्हिया हॉस्पिटा

**Family** : Sterculiaceae

**कुल :** मुचकुंद

**नावाची उत्पत्ती :** क्लाईनॉव्ह या डच वनस्पती-शास्त्रज्ञाच्या गौरवार्थ क्लाईनोव्हिया हे प्रजातीवाचक नाव पडले तर हा वनस्पतीशास्त्रज्ञ अत्यंत अगत्यशील होता म्हणून हॉस्पिटा हे विशेषण. या वृक्षावर अनेक परजीवी वास करतात. म्हणूनही हॉस्पिटा हे नाव पडले असावे.

**आढळ :** वृक्षाची आयात मलाक्का बेटावरून १७९८ साली सर्वप्रथम कोलकता येथे झाली अशी नोंद सापडते. आता भारतात या वृक्षाची सर्वत्र तुरळक लागवड झालेली दिसते.

**खोड :** फिकट तपकिरी, अनेकदा बारीक बारीक गाठी असलेले, फांद्या वेड्यावाकड्या.

**पाने :** एकांतरित, रुंद अंडाकृती, वा हृदयाकृती, देठ लांब-लचक, पात्याच्या तळाशी तीन ते सात सुस्पष्ट शिरा, रंग मळकट हिरवा.

**फुलोरा :** फांद्यांच्या टोकाशी मोठाले तुरे, अनेकदा खाली झुकलेले.

**फुले :** देखण्या गुलाबी रंगाची, काहीशी आइस्क्रीम गुलाबी वर्णाची, पुंकेसरांची नलिका उठावदार.

**फळे :** फुगीर बोंडे, त्यावर पाच अस्पष्ट धारा, आत पाच कप्पे.

**बिया :** फळाच्या प्रत्येक कप्प्यात एक-दोन बिया, गोलाकार, काळसर खडबडीत.

**हंगाम :** फुले - जुलै ते ऑक्टोबर, फळे - सप्टेंबर ते नोव्हेंबर.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** बंडगार्डन, बोटक्लब रोड (Y-22); डेक्कन जिमखाना सोसायटीचे ऑफीस (N-22).

# २३. कॅस्टॅनोस्परमम् (चेस्टनट ट्री)



मूळस्थान ऑस्टेलियात असलेला मध्यम आकाराचा सदाहरीत वृक्ष लाल शेंदरी फुले येत असली तरी दाट पानांमध्ये लपून राहतात. एक सौंदर्यवृक्ष म्हणून उद्यानात वापर जास्त.



**नाव :** कॅस्टॅनोस्परमम् (चेस्टनट ट्री)

**शास्त्रीय नाव :** *Castanospermum australe* A. Cunn.

कॅस्टॅनोस्पर्मम् ऑस्ट्रेले.

**Family** : Fabaceae

**कुल :** पलाश कुल

**नावाची उत्पत्ती :** *Castanospermum* हा लॅटीन शब्द अर्थ चेस्टनट सारखे बी असलेला आणि *Australe* म्हणजे ऑस्ट्रेलियन रहिवासी.

**आढळ :** मूळचा ऑस्ट्रेलियातील हा वृक्ष भारतीय उद्यानांमध्ये आढळतो.

**खोड :** सरळ; साल - गुळगुळीत, करडी; फांद्या - काहीशा खाली झुकलेल्या.

**पाने :** अतिशय मोठाली, जवळजवळ ३०-६० सें.मी. लांब, संयुक्त पिच्छाकृती, पर्णिका जवळजवळ पंधरा, लांबट अंडाकृती, सुमारे १२-१५ सें.मी. लांब टोकाची पर्णिका तुलनेने लहान आकारमानाची, पर्णिका चांबट, किंचित ताठर.

**फुलोरा :** किंचित विरळ झुबक्यांच्या स्वरूपात.

**फुले :** लालसर शेंदरी वर्णाची, हादग्याच्या फुलांसारखी, मात्र त्यांचे अस्तित्व खूप मोठाल्या पानांमुळे जाणवत नाही.

**फळे :** शेंगाच्या स्वरूपात, लांबी २०-२२ सें.मी.

**बिया :** प्रत्येक फळात ४ ते ५ बिया, गोलाकार, व्यास ३ सें.मी. चेस्टनट बियांसारख्या. फळे अचानक तडकून बिया इतस्तत: फेकल्या जातात.

**हंगाम :** फुले - उन्हाळ्याच्या प्रारंभी.

**लागवड :** बियांपासून.

**ठिकाण :** पंतांचा गोट, न्यू इंग्लिश स्कूल टिळक रोड समोर (Q-23).

# २४. गुलाबी सावर (शेव्हिंग ब्रश ट्री)



मॅक्सिको हे मूळ स्थान असलेला हा वृक्ष सौंदर्यवृक्ष म्हणून आयात झाला. मात्र फलधारणा कमी होत असल्यामुळे त्याचा फारसा प्रसार झाला नाही. फुलांचा गुलाबी रंग त्यामधील खूपसाऱ्या पुंकेसरांमुळे दिसतो. ही फुले पर्णविरहीत झाडावर फुलत असल्याने जास्त लक्षात राहतात.



**नाव :** गुलाबी सावर (शेव्हिंग ब्रश ट्री)

**शास्त्रीय नाव :** *Bombax ellipticum* H.BK.

बॉम्बॅक्स इलिप्टिकम्

**Family** : Bombacaceae

**कुल :** शाल्मली कुल

**नावाची उत्पत्ती :** बॉम्बॅक्स म्हणजे कापूस – बियाभोवती असलेल्या कापसामुळे तयार झालेले प्रजातीनांव आहे. इलिप्टीकम हे विशेषण पाकळ्याच्या लंबगोलाकार स्वरूपावरून मिळाले आहे.

**आढळ :** हा मुळचा मेक्सिकोचा रहिवासी. बागांमध्ये लावलेला आढळतो.

**खोड :** हिरवे, गुळगुळीत, कंटकहीन.

**पाने :** विरळ, एकांतरित रचना; पाते संयुक्त, हस्ताकृती, पर्णिका पाच बोटांसारख्या लांब, दोन्ही टोकांकडे निमुळत्या होत जाणा-या; पालवी लालसर.

**फुलोरा :** वृक्ष निष्पर्णावस्थेत फुलतो. गळलेल्या प्रत्येक पानाच्या बेचक्यातून फूल येते.

**फुले :** गुलाबी, पाच पाकळ्यांची; फूल उमलल्यावर पाकळ्या मागे वळतात; फुलातील सर्वाधिक आकर्षक भाग म्हणजे त्यातील असंख्य, पांढुरके गुलाबी, लांबलचक रेशमासारखे मुलायम पुंकेसर, पुंकेसराच्या अग्रभागी सोनेरी पिवळा परागकोष.

**फळे :** अद्याप दृष्टीस पडलेले नाही.

**बिया :** अद्याप दृष्टीस पडलेल्या नाहीत.

**हंगाम :** फुले – एप्रिल.

**लागवड :** छाटकलमाद्वारे होते.

**ठिकाण :** पुण्यात केवळ पुणे विद्यापीठाच्या वनस्पतिशास्त्र विभागातील उद्यानात (A-24).

## २५. दिल्ली-सावर



हिरवे टोकाकडे निमुळते होत जाणारे, बाटलीसारखे खोड, त्यावरील शंकूसारखे काटे, गुलाबी मोठी फुले हे वृक्ष विशेष. मूळ ब्राझील रहिवासी वृक्ष, बागांमध्ये सौंदर्यवृक्ष म्हणून लावण्यासाठी आयात केला. दिल्लीला मोठ्या प्रमाणात लावगड असल्याने त्याचे नावच दिल्ली-सावर पडले.



**नाव :** दिल्ली-सावर

**शास्त्रीय नाव :** *Chorisia speciosa* - A.St.Hill

कोरीसिया स्पेसिओसा

**Family** : Bombacaceae

**कुल :** शाल्मली (काटेसावर)

**नावाची उत्पत्ती :** लुडविग कोरिस या चित्रकाराच्या गौरवार्थ दिलेले प्रजातिवाचक नाव आहे. रशियन सागरप्रवासी ऑटो फॉन कोटझेबूसाठी कोरिस यानी या वनस्पतीची चित्रे काढली होती.

**आढळ :** मूळचा ब्राझीलचा रहिवासी; सौंदर्यवृक्ष म्हणून आयात केलेला.

**खोड :** आकार बाटलीसारखा, खाली रुंद व टोकाकडे निमुळते होत जाणारे, सर्वांगावर मोठे त्रिकोणी काटे; खोडाचा रंग राखाडी; कोवळ्या फांद्या हिरव्या.

**पाने :** हस्ताकृती, फांद्यांच्या टोकाशी, आकारमानाने मोठी; गडद, मळकट हिरवी.

**फुलोरा :** गळून पडलेल्या पानांच्या बेचक्यातून एकेकटे फूल.

**फुले :** देठ अतिशय लांब; पाकळ्या पाच सरळ उभ्या, लांबलचक, गुलाबी रंगाच्या; पाकळ्यांच्या मध्यावर लांबलचक लालबुंद पुंकेसर स्तंभ.

**फळे :** लांबट, बराच काळ हिरवी, पिकल्यावर पिवळसर, तंतुमय गाभा.

**बिया :** कापसासारख्या तंतूत लपेटलेल्या असंख्य बिया.

**हंगाम :** उन्हाळ्यात फुलतो.

**लागवड :** बियांपासून किंवा कोवळ्या फांद्यांपासून.

**उपयोग :** सौंदर्यवृक्ष म्हणून लागवड; रेशमी कापसाचा वापर सावरीच्या कापसासारखा होतो.

**ठिकाण :** पुण्यात श्री. किर्लोस्कर या वनस्पतिप्रेमींनी आणला असावा, त्यांच्या प्रांगणाबाहेर, मॉडेल कॉलनी (E-25); पौड रस्त्यावर 'येना' बंगल्यात (H-25); पोचा सीडस्च्या आवारात - सोलापूर रोड (U-25).

# २६. हुरा (सँड बॉक्स ट्री)



हा एक छोटेखानी वृक्ष आहे. काही वनस्पतीउद्यानांमध्ये मुद्दाम लागवड केलेला आढळतो. हा एक सौंदर्यवृक्ष म्हणून भारतात आला, व मुख्यत: उद्यानात लावला गेला. पुण्यामध्ये प्रथम गणेशखिंड वनस्पतिउद्यानात याची लागवड झाली. काटेरी खोड, हृदयाकृती, पोपटी-हिरवी विरळ पाने आणि गोल भेंडाप्रमाणे दिसणारी कडक फळे हे वृक्ष विशेष. नर-मादी फुले वेगवेगळी. मादी फुले सुरईच्या आकाराची.



**नाव :** हुरा

**शास्त्रीय नाव :** *Hura crepitans* L.

हुरा क्रेपिटान्स

**Family** : Euphorbiaceae

**कुल :** एरंड

**नावाची उत्पत्ती :** हुरा हे वनस्पती शास्त्रीय नाव दक्षिण-अमेरिकेतील कुठल्याशा स्थानिक नावावरून घेतले आहे.

**आढळ :** छोटेखानी वृक्ष. दक्षिण अमेरीकेतील वन्य. काही वनस्पतिउद्यानांमध्ये मुद्दाम लागवड केलेला.

**खोड :** राखाडी रंगाचे, काटेरी, सर्वांगातून चीक पाझरतो.

**पाने :** एकांतरित, साधी, पाते पिंपळपानासारखे हृदयाकार, अग्र निमुळते, कडा सूक्ष्म दंतुर, शिरा ठळक, पिवळसर.

**फुले :** एकलिंगी, मादी फूल दिमाखदार सुरईसारखे.

**फळे :** दहा ते पंधरा कप्पे असलेली, प्रत्येक कप्पा वेगळा होतो आणि फळ उकलते. फळ उकलताना फटाक्या-सारखा फट् असा आवाज येतो.

**बिया :** चपट्या कुयरीसारख्या, गडद चॉकलेटी-तपकिरी, टणक.

**हंगाम :** फुले - मे ते जून. फळे - तयार होण्यास आठ ते दहा महिने लागतात.

**लागवड :** बियांपासून. बी गरम पाण्यात भिजत ठेवावे लागते; किंवा सौम्य आम्लात बुडवून घ्यावे लागते.

**ठिकाण :** पुण्यामध्ये प्रथम गणेशखिंड वनस्पती-उद्यानात याची लागवड झाली. सध्या आघारकर संशोधन संस्था (AB-26) आणि आबासाहेब गरवारे महाविद्यालय येथे हा वृक्ष आहे (AA-26).

# नकाशा संदर्भ

| क्र. | झाडाचे नांव | नकाशा संदर्भ क्र. | पान क्र. |
|---|---|---|---|
| १. | उंडी | AA-1 | १२ |
| २. | सातवीण* | N-2, R-2 | १४ |
| ३. | रुद्राक्ष | I-3 | १६ |
| ४. | कनकचंपा | W-4, A-4 | १८ |
| ५. | वाळुंज | N-5 | २० |
| ६. | पॉपलर* | J-6 | २२ |
| ७. | तामण (ताम्हण)* | M-7, AB-7, Q-7, I-7 | २४ |
| ८. | तिवस (काळा पळस) | AA-8 | २६ |
| ९. | सुरंगी | G-9 | २८ |
| १०. | मुचकुंद* | X-10, K-10, C-10, Q-10 | ३० |
| ११. | सेमला कांचन | AB-11, P-11, B-11 | ३२ |
| १२. | सरल (पाईन) | AA-12, L-12, D-12 | ३४ |
| १३. | ॲक्रोकार्पस (रेड सेडर) | A-13, AB-13 | ३६ |
| १४. | सीतेचा अशोक* | V-14 | ३८ |
| १५. | गोरक्षचिंच | A-15, S-15 | ४० |
| १६. | कदंब* | O-16, AB-16 | ४२ |
| १७. | शमी | Z-17, I-17, P-17 | ४४ |
| १८. | बृहतपर्णी सातवीण | A-18, T-18, AB-18 | ४६ |
| १९. | कांचनराज | AB-19, V-19 | ४८ |
| २०. | श्वेत कांचन | AB-20 | ५० |
| २१. | सीतारंजन | Q-21, F-21, L-21, D-21 | ५२ |
| २२. | क्लाईनोव्हीया | Y-22, N-22 | ५४ |
| २३. | कॅस्टॅनोस्परमम् (चेस्टनट ट्री) | Q-23 | ५६ |
| २४. | गुलाबी सावर (शेव्हिंग ब्रश ट्री) | A-24 | ५८ |
| २५. | दिल्ली सावर | E-25, H-25, U-25 | ६० |
| २६. | हुरा (सँड बॉक्स ट्री) | AB-26, AA-26 | ६२ |

* चिन्हाद्वारे प्रातिनिधिक जागा दाखविल्या आहेत. आणखी काही ठिकाणीही हे वृक्ष आहेत.

